**विमा संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब (राजपत्रित) च्या पदांवर पदोन्नती देण्याकरिता निवडसूची तयार करण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१८/प्र.क्र.९१/विमा प्रशासन**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २३ ऑक्टोबर, २०१८.

वाचा:- १) शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०८१/१२५१/सीआर-६/८५/१२, दि.२३ जुलै, १९८५
२) शासन निर्णय क्र.विमासं-२०१३/प्र.क्र.७२/विमा प्रशा, दि.०६ सप्टेंबर,२०१३

**शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०८१/१२५१/ सीआर-६/८५/१२, दि.२३ जुलै,१९८५ च्या जोडपत्रातील अनु.क्र.३ मधील तरतुदीनुसार विभागीय पदोन्नती समितीची रचना करणे आवश्यक आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या आदेशान्वये विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उप विमा संचालक, गट-अ या पदावर पदोन्नती देण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीची पुनर्रचना करण्यात आली होती. राजपत्रित संवर्गातील उर्वरीत पदांवर पदोन्नत्या देण्यासाठी व निवडसूची नियमित करण्याकरिता विभागीय पदोन्नती समिती स्थापना केल्याबाबत अन्य आदेश निर्गमित केल्याचे उपलब्ध कागदपत्रावरून आढळत नाही.

२. यास्तव संदर्भाधीन क्र.२ चे आदेश रद्द करून विमा संचालनालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) च्या पदावर पदोन्नती देण्याकरिता निवडसूचीत समावेश करण्यासाठी संबंधीत उमेदवारांची पातत्रा आजमावण्यासाठी पुढिल प्रमाणे विभागीय पदोन्नती समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | प्रभारी सचिव (विमा प्रशासन), वित्त विभाग | अध्यक्ष |
| २) | सह/उप सचिव, वित्त विभाग(मागासवर्गीय प्रतिनिधी) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३) | अन्य सह/उप सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ४) | विमा संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ५) | सह/उपसचिव (विमा प्रशासन), वित्त विभाग | सदस्य सचिव |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२३१५५७२१३८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shubhangi Rajan Sheth

Digitally signed by Shubhangi Rajan Sheth
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed6787d4f25b2cc00214a10047a10d4fa848c8d19fb8dda27b4525e3ace2c767, cn=Shubhangi Rajan Sheth
Date: 2018.10.23 16:01:29 +05'30'

**(शुभांगी शेठ)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विमा संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक
३) प्रधान सचिव (ले. व को.) यांचे स्वीय सहायक,
४) सह सचिव (विमा प्रशासन) यांचे स्वीय सहायक,
५) वित्त विभाग, प्रशासन-१, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती , विमा प्रशासन.